**भा.प्र.से. परिविक्षाधिन अधिकारी-२०२४ या तुकडी अंतर्गत ०८ अधिसंख्य सहायक जिल्हाधिकारी पदे निर्माण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः पदनि-२०२५/प्र. क्र.४१/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक - २५ एप्रिल,२०२५.

**संदर्भ :-**

१. वित्त विभाग,शासन निर्णय, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२०/२/२०१६.
२. सामान्य प्रशासन विभाग,पत्र क्र. टीआरएन-१०२५/प्र.क्र.११८/२०२५/भाप्रसे १(दहा),दि.०२/०४/२०२५.
३. सामान्य प्रशासन विभाग,पत्र क्र. टीआरएन-१०२५/प्र.क्र.११८/२०२५/भाप्रसे १ (दहा),दि.८/०४/२०२५.

**शासन निर्णय :-**

सन २०२४ च्या तुकडीतील परिविक्षाधीन भारतीय प्रशासन सेवेमधील ०८ अधिका-यांचे लाल बहादुर शास्त्री राष्ट्रीय प्रशासन अकादमी, मसुरी येथील फेझ-१ चे प्रशिक्षण दि.१८.०४.२०२५ (म. नं.) रोजी संपुष्टात आले आहे. सदर प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर हे अधिकारी त्यांच्या पुढील जिल्हा प्रशिक्षणाकरीता राज्य शासनाकडे रुजू झाले आहेत. सदरहू ०८ भारतीय प्रशासन सेवेमधील अधिकाऱ्यांच्या पुढील जिल्हा प्रशिक्षणासाठी सहायक जिल्हाधिकारी म्हणून त्यांच्या नावासमोर नमूद केलेल्या जिल्ह्यात पदस्थापना करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुषंगाने सदर ०८ भारतीय प्रशासन सेवेमधील अधिकाऱ्यांसाठी खाली नमुद केलेल्या जिल्हाधिकारी कार्यालयांच्या आस्थापनेवर सहायक जिल्हाधिकारी संवर्गात पुढील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे दोन वर्षांच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी अधिसंख्य सहायक जिल्हाधिकारी पद निर्माण करण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे -

| अ.क्र. | परिविक्षाधीन भा.प्र.से. अधिकाऱ्यांचे नाव | जिल्हा प्रशिक्षणासाठी प्रस्तावित जिल्हा | परिविक्षाधीन कालावधी |
|---|---|---|---|
| १ | श्रीमती दोनुरू अनन्या रेड्डी | नांदेड | दि.२६.०८.२०२४ ते दि. २५.०८.२०२६ |
| २ | श्री. पी. के. सिध्दार्थ राजकुमार | नाशिक | दि.२६.०८.२०२४ ते दि. २५.०८.२०२६ |
| ३ | श्री. कुश मोटवानी | नागपूर | दि.२६.०८.२०२४ ते दि. २५.०८.२०२६ |
| ४ | श्री. आकाश वर्मा | वाशिम | दि.२६.०८.२०२४ ते दि. २५.०८.२०२६ |
| ५ | श्री. साईकिरण नंदाला | गोंदिया | दि.२६.०८.२०२४ ते दि. २५.०८.२०२६ |
| ६ | श्रीमती कौसल्या एम | अमरावती | दि.२६.०८.२०२४ ते दि. २५.०८.२०२६ |
| ७ | श्री. योगेश कुमार मीना | हिंगोली | दि.२६.०८.२०२४ ते दि. २५.०८.२०२६ |
| ८ | श्री. शिवांश सिंग | नंदुरबार | दि.२६.०८.२०२४ ते दि. २५.०८.२०२६ |

२. शासनाने वेळोवेळी काढलेल्या आदेशानुसार उपरोक्त अधिसंख्य सहायक जिल्हाधिकारी यांना महागाई भत्ता व इतर भत्ते अनुज्ञेय राहतील.

३. सदरहू अधिसंख्य सहाय्यक जिल्हाधिकारी यांच्या पदावर होणारा खर्च " मागणी क्र. सी-१-२०५३ - जिल्हा प्रशासन (००) ०९३ जिल्हा आस्थापना आस्थापना (०१) (०१)आयुक्त कोकण (२०५३ ००२८), (०१)(०२) आयुक्त नाशिक (२०५३ ००४६), (०१)(०३) आयुक्त, पुणे (२०५३ ००६४), (०१)(०४) आयुक्त अमरावती (२०५३ ००८२), (०१)(०५) आयुक्त नागपूर (२०५३ ०१०८), (०१)(०६) आयुक्त छत्रपती संभाजीनगर (२०५३ ०१२६) बाब क्र. ०१ वेतन " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय हा वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २० फेब्रुवारी,२०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०४२५१४३९२७४११९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=559498df564ab1121a356349085c1b8e3cc0f12569ba0f7f2090386d4dccb333, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E085E02041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2025.04.25 14:40:31 +05'30'

**( सत्यनारायण बजाज )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक/छत्रपती संभाजीनगर/ अमरावती व नागपूर.
२) जिल्हाधिकारी, नांदेड/नाशिक/नागपूर/वाशिम/गोंदिया/अमरावती/हिंगोली व नंदुरबार.
३) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) महाराष्ट्र -१/२, मुंबई /नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड/नाशिक/नागपूर/वाशिम/गोंदिया/अमरावती/हिंगोली व नंदुरबार.
५) उप सचिव / अवर सचिव, (कार्यासन १०), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६) उप सचिव, वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
७) सह सचिव / उप सचिव (कार्यासन ब-१ / ई-१) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) निवड नस्ती, कार्यासन ई-८.